राष्ट्रीय आरोगय अभियान अंतर्गत राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रणक कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ करीता कुष्ठरुग्णांकरीता औषधे व औषधी साहित्य खरेदीस प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१०१८/प्र.क्र.४९८/आ -७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २५ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-**

१) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/खरेदी कक्ष/ १८-१९/एनएलईपी/प्रशा.मान्यता/५८३६-३८/२०१८, दिनांक ३ ऑक्टोबर, २०१८.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६ जुलै, २०१७.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ मध्ये पीआयपी अंतर्गत कुष्ठरुग्णांसाठी आवश्यक असणारी औषधे व औषधी साहित्य खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांच्या संदर्भीय दिनांक ३ ऑक्टोबर, २०१८ च्या पत्राच्या अनुषंगाने केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ PIP ला मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुषंगाने संचालक, आरोगय सेवा संचालनालय, मुंबई यांच्या कार्यक्षेत्रातील कुष्ठरुग्णांसाठी आवश्यक असणारी औषधे व औषधी साहित्य उपलब्ध करुन देण्याबाबत प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. सन २०१८-१९ मध्ये NHM FMR Code १.१.५.५ नुसार कुष्ठरुग्णांना आवश्यक असणाऱ्या औषधे व औषधी साहित्याच्या खरेदीकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| Sr. No. | Drug Name | Specification | Drug Type | Last PO Rate | Unit in which requirement should be given | Total Requirement | Total Amount |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Framycetin Sulphate Cream 30 gm | Oint.Framycetin skin 1% w/w 30 gm | Ointment | 21 | Tube | 7500 | 1,75,500 |
| 2 | Prednisolone Tab 10 mg | Tab Prednisolone 10mg Aluminium Blister-Strip of 10 Tabs | Tablets | 1.239 | Numbers | 300000 | 3,71,700 |
| 3 | While Petroleum Jelly 1 Kg | White Petroleum Jelly 1 Kg Packts | Oitment | 218.7 | Numbers | 2000 | 4,37,700 |
| 4 | Povidone Iodine Ointment 15 gm | Povideone Iodine Ointment 15 gm | Topical Medicines | 7.35 | Numbers | 40000 | 2,94,000 |
| | | | | | | TOTAL Amout Rs. | 12,60,600/- |

३. सदरची प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर कुष्ठरुग्णांना आवश्यक असणारी औषधे व औषधी साहित्य यांची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी वाचा येथील शासन निर्णय, दिनांक २६ जुलै, २०१७ नुसार निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू कुष्ठरुग्णांना आवश्यक असणारी औषधे व औषधी साहित्य यांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च NHM FMR Code १.१.५.५ नुसार कुष्ठरुग्णासाठी आवश्यक असणारी औषधे व औषधी खरेदीकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

१२) प्रस्तुत प्रकरणी किती निधीची खरेदी करण्यात आली व संबंधीत एपकरणे कोणत्या जिल्ह्यांना व किती पुरवठा करण्यात आला, याची माहिती शासनास सादर करण्यात यावी.

४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १२ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२५१०४६०६४६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.10.25 12:13:34 +05'30'

**(सु. अ. पेडगांवकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत :-

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
२)अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
३) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
४) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
५) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
६) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
७)सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
८) निवडनस्ती (आरोग्य-७)